# डाव चालुच रहायला हवा....



ती नी मी....

बुद्धिबळाचा डाव खेळताना
मी चेक-मेट दिला
हसलो खुषीत मिशीतल्या मिशीत
ती म्हणाली
असा संपवू नये डाव राजा
डाव चालुच रहायला हवा
चालु रहायला हवा
आणि शांतपणे मेलेल्या राजाचा मुडदा उचलून
तिने पुन्हा पटावर उभा केला

अहं ब्रह्मास्मि



**घनश्याम पोटभरे उर्फ कवी अहं ब्रह्मास्मि**

ह्या काव्यब्रह्मास व नेटाक्षरीच्या माजी संपादकास
ही भावपूर्ण श्रद्धांजली

जन्म – ८ एप्रिल १९६५
मृत्यु – ८ एप्रिल २०१०

ई-साहित्य प्रकाशन
दिनांक :११ एप्रिल २०१०

# अहं ब्रह्मास्मि – एक अधुरा प्रवास

## अहं ब्रह्मास्मि - एक कवी – नाम गुम जायेगा यांच्या शब्दातून

वर्षा ऋतु सुखाचा, शिशीरातही आनंदी
सौंदर्य हर ऋतुचे, ह्रदयी सदा वसंत

जगता असे भरुन, या चालत्या क्षणात
मृत्यु कधीही यावा, हॉईल तॉ सुखान्त

अहं ब्रह्मास्मि यांच्या एका कवितेतल्या या ओळींनी तेव्हा अनेकांची दाद घेतली. मीही वाह वाह म्हटलं. या विश्वात जर पॉझीटिव्ह नजर ठेवली तर सर्वत्र सुखच सुख दिसतं. सर्व ऋतु सुखाचे होतातच , पण मरणही सुख देतं असं ब्रह्माजी मानत. खुप आवडल्या त्यांच्या कविता. पण आज जेव्हा मराठी साहित्यातला हा उगवता तारा निखळल्याचं कळलं तेव्हा या ओळींची दुसरी बाजू जाणवली. जीव हळहळला. त्यांच्या अकाली मृत्युने एक मोठा ठेवा हरवल्याची भावना झाली. तसे ब्रह्माजी लौकिक संपत्तीचे लोभी नव्हतेच. या जगाच्या सामान्य व्यवहारांकडे हा कवी भातुकलीच्या खेळाकडे पहातात तसा पहायचा. कवीतेतच नव्हे तर नेहमीच. मृत्यु ! नुसत्या कल्पनेनेच शहारे येतात. पण याने मृत्युकडेही एक सहज घटना म्हणुन पाहिलं.

उजेडानेच होतो, सावलीचा भास
मधे असे अंत, पुढे मागे श्वास

जीवनाला लागे, मरणाचा ध्यास
मृत्युनेच शांती, जगण्याने त्रास

मेला तॉ सुटला, जगणा-या फास
मेलं जर कॉणी, आनंदाने हास !

घडीभराचा हा, फसवा प्रवास
जन्मा येई जे जे, पावे ते ते नाश

जगणं अपवाद, एक बाब ख्रास
मृत्यु हा नियम, सारे करी ग्रास



काव्यब्रह्माचा अस्त....

मृत्युचं यांनी कायमच स्वागत केलं. त्याची भिती बाळगली नाही. मात्र याचा अर्थ असा नाही की त्यांनी आयुष्याकडे निराशावादी नजरेने पाहिलं. अजिबात नाही. अत्यंत जीवनवादी आणि आनंदमय अशी त्यांची दृष्टी होती. आनंद, सुख यांच्यासाठी कसल्याही बाह्य कारणाची त्यांना गरज भासली नाही.

डोळ्यांच्या या खाचा झाल्या
तरी राम तो सदा दिसावा
बहिरे झाले कान तरीही
मंजुळ पावा ऐकू यावा

मीठ-भाकरी पुढ्यात येता
पक्वान्नाचा घासच व्हावा
असो कशीही बाह्य परिस्थिती
अंतरात परी आनंद रहावा

बेड्या पडल्या, टाळे पडले
तरिही तो रावा नभी उडावा

फिरुनी येता जन्माला मी
पहिल्या गावा मोक्ष स्मरावा

दगडावरुनी हातही फिरता
मऊशार तो मज लागावा
बाहेर असो कुठलाही गंध
श्वास सुगंधी होऊन जावा

वादळ-वारे सुटल्यावरही
मंदिरातला दिवा जळावा
सुखात असण्या नकोच कारण
उगाच सुखिया जिवडा व्हावा



त्यांची जगाकडे बघण्याची भव्य दृष्टी हेच त्यांचं वैशिष्ट्य होतं. क्षुद्रपणाचा लवलेश नाही. ना लिहीण्यात, ना वागण्यात. मानवाकडे ते एक हतबल प्राणी म्हणुन बघत नसत तर ईश्वरी शक्तीचा एक साक्षात्कार म्हणुन बघत. मानवजन्म म्हणजे सामर्थ्याचं वरदान मानत. टल्ली नावाचा एका कवी निराशेच्या झटक्यात दारूच्या आहारी जात असता त्यांनी त्याची कानउघाडणी केली हॊती.

विश्वाला निर्मिले
तुझ्याच मनाने
कॊणती कमी रे
तुझ्यात गुणाने

ठरव फक्त तू
हालतील पर्वत
जाऊन त्यांना
धडक बेमुर्वत

तू तर प्रकाश
क्षणात पसर
संकल्पात मात्र
नको रे कसर

कर की निश्चय
पळ...पाय नसून
महाभुतांचेच बळ
तुझ्यामधे वसुन

शक्य सारे तुला
शक्ती आहेस तू
नको तू विसरु
ब्रह्म आहेस तू



म्हणून ते स्वतःला तर अहं ब्रह्मास्मि म्हणवतच; पण आपल्या प्रत्येक मित्राचा उल्लेख ते ब्रह्म असा करत. अगदी लहानातल्या लहान मुलालाही ते ब्रह्म म्हणत. प्रत्येक जीवी ब्रह्माचा वास असल्याची त्यांची धारणा अत्यंत दृढ होती. स्वतःच्या वैश्विक शक्तीचा सार्थ अभिमान होता.
ईश्वराच्या कार्याबद्दलही त्यांची स्वतःची अशी खास मतं होती.

त्याने पेरली
काही सूर्य-बीजे
अंतरिक्षाच्या शिवारात
अन स्वतःचा गाभा फोडून
तप्त लाव्हा बरसला दशदिशांना
इतकं करुन मग तो निश्चिंत झाला

(या कवितेची एक गंमत पाहिली का? वरुन आलेल्या प्रकाश झोता सारखी ही कविता दिसते. त्यांच्या कविता केवळ वाचनीयच नव्हे तर प्रेक्षणीयही असत.
जाता जाता ही झुरळाची कविता बघा

<u>व ळ व ळ</u>

झु झु
र र
ळे
पोलादी
व ळ चिमटीमध्ये व ळ
सापडलेल्या
व ळ झुरळांचे पाय व ळ
करत रहाति
ळ सतत व
व ळ



दिसलं ना झुरळ ?

त्यांच्या अत्यंत आशावादी आणि जीवनाभिमुख कवितांचे काही नमुने बघा ...

शब्दच नुसते पुरले का रे
सायकलवर जेव्हा बसला
अर्धे पायडल फिरवत-फिरवत
सांग कितिदा धडपडला?

करुन पाहूनि ना-ना युक्त्या
तॉल तुला मग जमला होता
व्यर्थिचे सारे ज्ञान होतसे
जोवरी अनुभव स्वतः न घेता

पुस्तकातले वाचून वर्णन
पोॅहण्यास रे कुणास जमले?
खोल जळी रे जॉं-जॉं उतरे
तयालाच ना अवगत झाले?

फिकीर ‘उद्या’ची कशा करावी
‘काल’च तर तॉ येऊन गेला
काल-परिघावर मागे जाता
बिंदू ‘उद्या’चा ‘काल’च झाला

-------------

कर की निश्चय
पळ...पाय नसून
महाभुतांचेच बळ
तुझ्यामधे वसुन

शक्य सारे तुला
शक्ती आहेस तू
नको तू विसरु
ब्रह्म आहेस तू



कृती करुनच माणूस प्रगती करु शकतो यावर त्यांचा ठाम विश्वास होता. अपयशाने खचून न जाता सतत प्रयत्न करण्याची जिजीविषु वृत्ती त्यांच्या कवितांतून पदोपदी जाणवते.
त्यांच्या नजरेत ईश्वर म्हणजे तर खास मित्रच जणू ....

वेढून असता तव जल शितल
शोक-ताप का जाळु शकतील?

योग-सुखाने न्हाऊ घालसी
ब्रह्म-पदाचे कोंड पुरविसी

ईश्वराकडे त्यांचं मागणं तरी काय ? काहीच नाही. कारण या जगातली सर्वात मोठी संपत्ती त्यांच्या मते एकच.. श्वास.  या संपत्तीपुढे सारे काही तुच्छ. आणि ही संपत्ती तर मोफ़त मिळते.

अस्तित्व फक्त येथे, आहे पुरे खुषीला
मिळतात मुक्त प्राण, मी एक भाग्यवंत



ब्रह्माजींच्या विचारातली झेप समजून घेण्यासाठी त्यांच्या कविता मुळातूनच वाचायला हव्यात. प्रत्येक वाचकाला नवीन दष्टी देणारी ही कविता आपण वाचावी आणि अहं ब्रह्मास्मि या वचनाचा अर्थ स्वतःच स्वतः लावावा हेच उत्तम.

ब्रह्मांडात जे जे
तेचि या पिंडात
ब्रह्माचिच बात
तंतोतंत

देव ना आकाशी
नको वथा भ्रम
आहोत ते ब्रह्म
आपणचि

घनश्याम पोटभरे उर्फ अहं ब्रह्मास्मि
यांची काही वेचलेली काव्यसुमने




# मी नसेच तो

मी नसे शरीर वा, नसे बुद्धि अन मन हे
मी नसेच तो रे, जसा समजती जन हे

मी मातीचा ना सुर्याचा
ना आकाशाचा कोणी
वारा ना माझा लागत काही
आणिक ना रे पाणी

होतो तेव्हाही....नव्हतेचि जेव्हा घन हे
मी नसेच तो रे, जसा समजती जन हे

मी सत्य-असत्या पल्याड
मजला पाप-पुण्य लागेना
ना धर्म कोठला माझा आणिक
इच्छा मज बाधेना

सुख-दुःखांविन...सजले माझे जीवन हे
मी नसेच तो रे, जसा समजती जन हे

श्वासांचा झुला झुलवत सा-या
रुधिरामधुनि वाहे
परी ना दिसतो जो कोठेही तो
तोच खरा मी आहे

जे नभात फुलले...असे आगळे वन हे
मी नसेच तो रे, जसा समजती जन हे



---------------

# भिंती

बांधुन भिंती पहाडापरी
मानवतेला चिणले त्यातुन
चढवत गेले विटा, विटांवर
टाहो फुटले जरी तयातुन

त्वेष हातांना, पिसाट भारी
द्वेष विखारी, अचाट-कारी
खून पहाया सरावलेले
थकले ना ते रक्ता पाहून
चढवत गेले विटा, विटांवर
टाहो फुटले जरी तयातुन

समजे ना त्यांना हे घातक
भिंत असे गर्वाचे द्योतक
खिळे नी काचा धारदारशा
भिंतीवरती ठासून रोवून
चढवत गेले विटा, विटांवर
टाहो फुटले जरी तयातुन

भिंती वाढत, गेल्या वेढत
आभाळाचे तुकडे पाडत
मोरापरी हे झुंझट कुक्कुट
खुराड्यांत त्या दाविती नाचुन
चढवत गेले विटा, विटांवर
टाहो फुटले जरी तयातुन

--------------



# एक छोटी

एक छोटी
पोटासाठी
ट्रॅफिकच्या पुरात
फोफवलेल्या धुरात
खपाटलेले पोट दाखवून
चेह-यावर लाचारी थापून
भुकेचे गाणे गात होती
कोरडे हुंदके देत होती

वय तिचे बागडण्याचे
रुसण्याचे अन फुगण्याचे
पण रुसणे गेले होते संपून
बागडणे गेले होते हरपून

लोक हातानीच झिडकारत होते
कुत्र्यासारखे हाड हाड करत होते
तरी तिथेच घुटमळत होती
सारे अपमान गिळत होती

कोण तिचे कौतुक करणार?
कोण तिच्यावर सावली धरणार?
तिच्या आयुष्याचे पुढे होणार तरी काय?
रस्ताच जिचा बाप, अन रस्ताच जिची माय !

---------------



# दिवे कशाला



दिवे कशाला सूर्य उगवता
पाय कशाला पंख उघडता
जाणण्यास मग काय रहाते
एक स्वतःला जाणुन घेता

फुल उमलता कशास अत्तर
सवाल नसता कसले उत्तर
बंदी बनवूनी स्वतःलाच का
बंदीगृही फोडावे फत्तर

अंधारावर का भाळावे
किडे मकोडे का पाळावे
गंगा सारी दारी असता
डबक्या मध्ये का लोंळावे

घर विश्वाचे उघडे असता
चौ भिंतींवर कसली सत्ता
चुल बोंळकी मातीची ती
त्यांच्या बद्दल कसली ममता

अमृत असता मदिरा का ती
निवड असे ती माझ्या हाती
एकाशी त्या नाते जुळता
हवी कशाला बाकी नाती

---------------



# मन

मन माकड माकड, त्यात शेपूट वाकडं
पेटवूनही जळेना, असं ऑलेतं लाकुड

मन माजलेला बैल, त्यात दावे त्याचे सल
मन अथांगशी निद्रा, नाही कुठे त्याचा पल

मन गुहा वाघळाची, त्यात रात्र अवसेची
नाचतात संबंधाच्या, तालावर भुते पाची

मन सापापरी चाले, त्यात पंखही फुटले
काथ्या झाला वस्त्रगाळ, त्याने इतके कुटले

मन बकासुरी भूक, त्यात दुष्काळाचे मुख
मिळाले ते विसरले, जे ना मिळे त्यात सुख

---------------



# दंगा



आभाळाच्या घरट्यामध्ये
ढग पक्षी बनून येतात
थोडा वेळ दंगा घालून
आपल्या मार्गे उडून जातात

थांबा म्हणुन थांबत नाहीत
हाकलून सुद्धा जात नाहीत
कधी वारा पिऊन येतात
कधी पाऊस घेऊन जातात
थोडा वेळ दंगा घालून
आपल्या मार्गे उडून जातात

चिमण्या पाहून आभाळ भुलतं
पंखाच्या स्पर्शाने ते खुलतं
चिमण्या त्याचा कब्जा घेतात
येडा खुळा त्याला करतात
थोडा वेळ दंगा घालून
आपल्या मार्गे उडून जातात

कधी येतात गिधाडे बनून
खेचतात त्याची शेपटी धरुन
आभाळाचे लचके तोडून
मातीमध्ये त्याला घोळतात
थोडा वेळ दंगा घालून
आपल्या मार्गे उडून जातात

--------------



# Designer Poem

हा..
माणुस..
एक अपरिचित शब्द..
प्रत्यक्षात पाहिला मात्र नाही कधी.
पाहिल्या आहेत फक्त त्याच्या जुजबी प्रतिकृती..
भविष्यकाळातले काही प्रॉटॉ-टाईप्स.
असंख्य त्रुटींनी भरलेले..
तकलादू.
का?

कारण..
निसर्गतः..
२ माकडाच्या संयोगाने..
वाढत रहाणार फक्त वानरांचीच पैदास.
सहस्त्रावधी वर्षांनी उत्क्रांतीचे सागर ऑलांडून..
अवतरेलही कदाचित खराखुरा मानव..
दाखवलीय ज्याने झलक..
क्वचितच..
कधी.

---------------



# अस्तित्व फक्त

चिंता जराही नाही, कसलीच नाही खंत
घडते आनंदयात्रा, असता इथे जिवंत



अस्तित्व फक्त येथे, आहे पुरे खुषीला
मिळतात मुक्त प्राण, मी एक भाग्यवंत

माझ्यापरी न कोणी, मी आगळा निराळा
माझ्याच ठायी वसते, संपूर्ण ते अनंत

भूते ही शक्तीशाली, दिमतीस येत माझ्या
पृथ्वी ही भोगतो मी, श्वासा नसे उसंत

वर्षा ऋतु सुखाचा, शिशीरातही आनंदी
सौंदर्य हर ऋतुचे, ह्रदयी सदा वसंत

जगता असे भरुन, या चालत्या क्षणात
मृत्यु कधीही यावा, होईल तो सुखान्त

---------------



# कधी न भंगे तो अभंग

सोंपविला भार
तुझ्यावर आता
तूच एक त्राता
दयानिधी ।।१।।

तुझ्याच छायेत
विसरला शीण
उरले न हीण
देहामाजी ।।२।।

धरणी उशाला
आकाशाचि शाल
प्रणवाचा ताल
कानावरी ।।३।।

तुटुनिया गेले
पाश संसाराचे
विश्व हे घराचे
रुप झाले ।।४।।

हात हे मोंकळे
तुला वंदावया
धन्य झाली काया
तुझ्या पायी ।।५।।

आनंदाने जड
विलोप पावले
झाड झेपावले
बिजाकडे ।।६।।



--------------

काव्यब्रह्माचा अस्त....

# शोध अस्तित्वाचा

घेऊ जाता बुद्धी, शोध अस्तित्वाचा
अहंकार साचा, गळो पडे ।।१।।

जेथून आरंभ, जाहला सृष्टीचा ..
तयाही पूर्वीचा, कोण, काय ? ।।२।।

खुंटला विचार, चक्रावले डोके ..
मनाचेही झोके, बंद झाले ।।३।।

बाहेरील शोध, आपचि थांबला..
क्षणी उतरला, अंतरंगी ।।४।।

सापडली तेथे, सारीच उत्तरे..
प्रश्न आता नूरे, कोणताही ।।५।।

आपणच होता आपुल्यात बंद
आनंदाचा कंद, एकलाचि ।।६।।

पडता बाहेर, शांती काढे पळ..
सुटले वादळ, दाही दिशा ।।७।।

---------------



# श्वास

सोबती क्षणाचे सारे..
सोडूनिया जाती ख्वास
सोडले कधी न ज्याने..
असा फ़क्त माझा श्वास

जे-जे काही केले गेले
मीच केले, वाटे मला
करविता तोच होता..
वृथा अहंकार केला

तयाचि अवज्ञा फ़ार..
केली आजवरी हाय.. !
सोडुनिया तोहि जाता..
जगी मग उरे काय ?

---------------





# देव नाही.. न्हावी नाही

न्हावी थोडा चिडून म्हणाला...
"देव नसे तो कुठे जगात
असता तर का इथली दुःखे,
बसला असता असा पहात?"

" जगात या न्हावीही नाही"
एक गि-हाईक म्हणे हसोनी,
रस्त्यावरच्या जटा वाढल्या..
भणंगाकडे बोट दाऊनी

न्हावी आश्चर्याने वदला...
" काय बोलता हे हो बापू !
माझ्यापाशी आल्याविण तो,
केस तयाचे कसे मी कापू?"

"तसेच तेही आहे मित्रा"
गि-हाईक ते ज्ञानी बोले
"देवापाशी गेलो तर ना
निवारील तो दुःख आपुले!"

---------------





# गम्मत

त्याने पेरली..
काही सूर्य-बीजे
अंतरिक्षाच्या शिवारात

अन स्वतःचा गाभा फ़ोडून..
तप्त लाव्हा बरसला दशदिशांना
इतकं करून मग तो निश्‍चिंत झाला

आज काळाच्या एका तुकड्यावर फुटलेत..
त्या बीजांना अंकुर छान भरघोस पीक आलंय
लक्ष लक्ष आकाशगंगांची कणसं डोलतायंत
प्रत्येक कणसाला लगडले आहेत हजारो सूर्य, लाखो चंद्र

हा शेतकरी मात्र..
अगदीच अजब आहे
आता निवांत झोपलाय
भरल्या पिकाकडे पाठ करून

त्याला ना पिकाच्या राखणीत रस
ना पिकाची कापणी, साठवणी करण्यात

जणू सहज गम्मत म्हणून शेती करून पाहिली
झोपेतून उठल्यावर कोण जाणे कुठली लहर येईल..!!



---------------

# आम्ही तर..

रोज नव-नवीन चमत्कारी खेळणी
विज्ञानाला हाताशी धरून..
आम्ही आज तयार करतो

आम्ही तर आधुनिक ब्रह्मदेवच..
विश्वाची निर्मीती करणारे

अमाप संपत्ती साठवतो, जपतो
कोणताही भलाबुरा मार्ग अवलंबून..
सतत त्यात वाढ कशी होईल ते बघतो..

आम्ही तर आधुनिक विष्णुच ...
सगळ्यांचा प्रतिपाळ करणारे

काळीज गोठवून टाकणारी भीषणता
आम्ही चहाच्या घोटाबरोबर
मिटक्या मारत पितो

आम्ही तर आधुनिक शंकरच...
सहजतेने हलाहल पचवणारे



# परीघावरचा प्रवास

फ़िकीर उद्याची कशा करावी
कालच तो तर येऊन गेला
काल परीघावर मागे जाता
बिंदू उद्याचा कालचा झाला

आदि अंत ना काल वर्तुळा
बिंदुवर मी उभा आजच्या
चालत रहाता पुढे पुढे मी
पोहचेन जागी आरंभाच्या

जिथे असे ते घर प्रेमाचे
घेईन म्हणतो तिथे विसावा
शीणच सारा हरून जाता
पुन्हा प्रवासा आरंभ व्हावा

विसरीन जर का परी कधी मी
प्रवासात घर मुक्कामाचे
आनंद सारा हरपून जाईल
प्रवास होईल केवळ ओझे

परीघावरती फ़िरताना मग
कधी एकदा असे घडावे
घरीच रहावे कायमसाठी
भटक-चक्र हे थांबुन जावे



---------------

# संधी



विरता विरता पुन्हा उमटली
आयुष्याची नश्वर रेषा
तेंव्हा कोठे मला उमगली
थंड अटळ मृत्यूची भाषा

श्वास सहजसे चालू असता..
कितीक गमज्या केल्या होत्या
खांद्यावरुनी मिरवत मी च्या
रोज पालख्या नेल्या होत्या

हाका मारत होते अविरत
त्या हृदयाला साद न दिली
दुनियादारीच्या बाजारी
हाक तयाची मुकी राहिली

थकले मग ते आणि थांबले
तेंव्हा कोठे जागा झालो
परी उमगले नाही कूठल्या
अंधा-या या जागी आलो?

गुदमरलेल्या मला पाहुनी
हृदयाला मम करुणा आली
पुन्हा बिचारे चालू झाले
पुन्हा एकदा संधी दिधली



---------------

# काव्यब्रह्माचा अस्त.......

घनश्याम पोटभरे उर्फ अहं ब्रह्मास्मि – एक कवी...... सारंग भणगे यांच्या शब्दातून......

ब्रह्माजी आपल्यात नाहीत ही बातमी काल रात्री कळली आणि सुन्न झालो. त्यापाठोपाठ कालच त्यांचा वाढदिवस होता हे ही कळले आणि आणखी धक्का बसला. प्रथम ब्रह्माजींना माझी मनःपुर्वक आणि भावपुर्ण श्रद्धांजली.

ब्रह्मास्मि : एक कवी – खालील कविता वाचा. या कवितेत आजवर आपण वाचलेल्या हजारो-लाखो-करोडो कवितांपेक्षा एक वेगळेपण आहे, एक uniqueness आहे. बघा लक्षात येतो का....

एका जागी
एक होतं शून्य
पक्कं अहंमन्य
कधी अणू, कधी ब्रह्मांडा एवढं
कधी कारकून कधी गुंडा एवढं
शून्याच्या पोटात, आणखी बरीच शून्यं
जेवढी अधिक शून्य, त्याला वाटे धन्य!
प्रत्येक शून्याच्या मूल्याला, मागचा एकचाच आधार
तो एक असेपर्यंत रोषणाई, आकडा काढताच अंधार!
दाहक सत्याला झुगारून देऊन, मिरवतराही आपलाच तोरा
भरपूर गिचमिड करून देखील, कागद अखेर करकरीत कोरा
शून्याला अंधुकशी जाणीव, काही आपले आहे हरवले
शोधून शोधून थकून गेले, काय शोधतो तेच विसरले
कधी शोधी कागदावर, कधी शून्याकडेच
अजून कुठे शोधेल, त्याचे जग एवढेच
शून्य निराशेने, आकसत गेले
पोकळीमध्ये, नाहीसे होत गेले
अंतिम क्षणाला
त्याला स्मरला
तो एक
१



---------------

कवितेला शब्द असतात, भाव-भावना असतात, अर्थ असतो, आशय असतो, वत्त; छंद; अलंकार असतात. पण कवितेला आकार असतो असे म्हटले तर कसे वाटेल. परंतु वरील कवितेत शब्द, भाव, अर्थ आणि आशय तर आहेच; परंतु त्या कवितेला आपला एक आकार आहे. आता हिच कविता central align करुन पहा आणि पहा काय आकार येतो. शून्यावरच्या या अशून्य कवितेचा आकारही मग शून्यासारखाच गोलाकार होतो. सदर कविता “ऑड वाटेच्या कविता” या समुहाच्या पुस्तकात प्रकाशित झाली होती, आणि ती कविता वाचल्यावर मी थक्क झालो होतो. नंतर लक्षात आले की ब्रह्माजींच्या अशा ईतरही ‘आकारबद्ध’ कविता आहेत. सृजनामध्ये सृजन आणणारा आणि तरिहि आशयाशी कधीही तडजोड न करणारं हे काव्यब्रह्म काल ब्रह्मतत्वात विलीन झालं. आपल्या समुहाच्या काव्यसृष्टीतील एक चमत्कार काही काळापुरता आपल्याला त्याच्या काव्यसाक्षात्काराने दिपवुन तेजाच्या दिव्यसृष्टीत विलय पावला, आपल्याला त्या दिव्य कवीविना झालेल्या पोकळीच्या अंधारात लोटून. ब्रह्मास्मिना माझी पुन्हा एकदा भावुक श्रद्धांजली !!!

आज पहाटे कडाडली ती
नाही झाला तरी आवाज
आणि नभाच्या निळ्या अंगणी
शांत उमटला शब्दब्रह्मसाज।

घनमेघांनी नभगर्भ होई
शब्दसरींनी भिजलो आपण
अता ग्रीष्माने भाजून जाऊ
स्वर्गी गेला निःशब्द श्रावण

क्षितीजावरती शब्दब्रह्म ते
प्रतिभेचा जणू प्रतिभास्कर तो
शब्दबाण ते नभीं सोडुनी
काव्यधनुचे रंग चितारतो

अता उरली माती केवळ
शुष्क नद्या नि फ़ुटके ढेकुळ
बाभुळकाटे सुकली झाडे
ब्रह्म लोपले ; धरती व्याकुळ ..... धरती व्याकुळ !



सारंग भणगे

## अहं ब्रह्मास्मि – एक कवी - आकाश बिरारी  यांच्या शब्दातून.....

काही वेळापुर्वी विनायकने आणि त्या पाठोपाठ सारंगने ही बातमी सांगितली. खुप वाईट वाटले. ब्रह्माजीना मी कधी भेटलो नाही पण ऑरकुटद्वारे आमच्यात एक आपुलकी निर्माण झाली होती. ब्रह्माजी समुहावर सक्रिय असताना प्रत्येक कवितेवर त्यांची हमखास प्रतिक्रिया असायची. त्यांच्या कवितांचा एक मोठा चाहता वर्ग तयार झाला होता, त्यातला मी एक.

समुहावर सक्रिय असणारे ब्रह्माजी काही दिवस दिसेनासे झाले तेव्हा ते आजारी असल्याचे समजले. त्यानंतर बरेच महिने ते आजारपणाशी झगडत होते. अधून मधून समुहावर यायचे.... आणि आज त्यांच्या वाढदिवशी अशी बातमी आली. मराठी कविता समूह एका चांगल्या कवीला, नेटाक्षरी च्या माजी संपादकाला... एका चांगल्या माणसाला मुकला....

देव त्यांच्या आत्म्याला शांती देवो.......

## अहं ब्रह्मास्मि – एक कवी - मयुरेश कुलकर्णी यांच्या शब्दातून.....

मी पण अहं ब्रह्मास्मि याना कधी भेटलो नाही. त्यांच खरं नावही माहित नव्हत बरेच दिवस. जेव्हा मी 'एनिमसजचा वीर' लिहायला लागलो तेव्हा त्यांची ओळख झाली. आम्ही भरपूर गप्पा मारल्या, चर्चा केली. त्यांनी 'जस्मिनचा रवी' लिहायला सुरुवात केली कारण त्यांना 'एनिमसजचा वीर' यातल्या काही गोष्टी पटल्या नाहीत.... आणि आज माझा 'जस्मिनचा रवी' दूर गेलाय...ऐकून एकदम सुन्न झालोय. यापुढे काय लिहू ते कळत नाही.

देव त्यांच्या आत्म्याला शांती देवो.......

## अहं ब्रह्मास्मि – एक कवी - आसावरी गुपचुप यांच्या शब्दातून.....



Nothing more could be painful. It is a major loss.
We shared an amzing thread "Tu Mazyavar Kavita karnar?"
and those days were absolutely magical.
I met him once before that.  A simple sweet personality.

We miss you Brahmaji.....

## अहं ब्रह्मास्मि – एक कवी - विजयकुमारजी (पुनःश्च हरि) यांच्या शब्दातून......

आज सकाळी शशांकचा फोन आला “ब्रह्माजी गेले” ......................

क्षणभर काय बोलावे सुचेचना. बातमीवर विश्वासही बसत नव्हता. परंतु सहसा अश्या वाईट बातम्या ख-याच असतात. त्यांचा माझा परिचय तसा जुना. प्रत्यक्षात भेट कधीच झाली नाही, परंतु फोनवर संपर्क असायचा. भेटू म्हणून बोलायचो परंतु वेळेअभावी ते जमले नाही. त्यांची मध्ये तब्येत बरी नव्हती. फोन केला होता तर म्हणाले. लिहिताना त्रास होतो आहे तरी डाव्या हाताने टाईप करतो आणि कविता पोस्ट करतो. आपल्या दुःखाचे त्यांनी कधीच भांडवल केले नाही. ते कधीच उघड केले नाही. सारी विरक्ती काव्यातून बाहेर काढली. अत्यंत समजूतदार, मनमिळावू असे व्यक्तिमत्व. कोणाशीही कसलाही वाद नाही. इतके उत्तम कवी असूनही त्याचा गर्व नाही. सतत दुस-याची तारीफ करत राहणे. अदृश्य अशी शाप सोडून हा माणूस गेला आहे. ईश्वरा तू निष्ठुर आहेस तरीही तुझ्या निष्ठुरतेला आवाहन करतो..... अहं ब्रह्मास्मिच्या आत्म्याला शांती दे !

## अहं ब्रह्मास्मि – एक व्यक्तित्व – नेटाक्षरी टिमच्या शब्दातून......

अहं ब्रह्मास्मि नाव घेतल की आठवतात मोग-याची फुलं, आपल्या अस्तित्वानेही वातावरण सुगंधीत करून सोडणारी.... अजातशत्रू, प्रेमळ, सर्वांशी आपुलकीने वागणारे असे कवी. यांच्याकडे कोणीही कधीही जावं आणि बोलावं. मग विषय कोणताही असो कविता, अध्यात्म, चित्रकला, वाद्य. कोणताच विषय त्यांना विरळा नव्हता. जसे ते उत्तम कवी होते त्याप्रमाणे उत्तम चित्रकार, फोटोग्राफर व वादक ही होते. कोणतही वाद्य ते न शिकता वाजवू शकत होते. अध्यात्माचा अभ्यास करणारे खूपजण असतात पण अध्यात्म जगणारे खूप कमी अशाच काही लोकांमध्ये अहं ब्रह्मास्मी यांच नाव घेता येईल. त्यांच्या कविता त्याच्या जीवनचक्राबद्दल खूपसं सांगून जातात.

## अहं ब्रह्मास्मि – एक कवी - हरीश दांगट यांच्या शब्दातून......

ब्रह्मास्मि यांच्या कविता अध्यात्मिक आणि गुढतत्ववादी होत्या,

त्या वेगळ्या उठून दिसायच्या.

त्यांचे आणखी एक योगदान म्हणजे नवशिक्या कविंना ते प्रोत्साहन द्यायचे.

परमेश्वर त्यांच्या आत्म्याला शांती देवो !



# खांद्यावरुन मिरवताना

१ वेड मोठे, भान कोठे
पायी काटे, रुतताना..

रात्र आंधळी, श्वास वादळी
रंग तांदळी, चढताना..

जीवन भिकारी, मरण विकारी
सतत चकारी, फिरताना..

वादळांनी पिडले, गाभ्यातच किडले
पाताळाला भिडले, हरताना..

मंदिराच्या गाभा-यात, घरातल्या देव्हा-यात
जगण्याच्या माते-यात, विझताना..

सरावलेल्या बाजारात, कमावलेल्या आजारात
गमावलेल्या शेजारात, कुढताना..

पानगळीच्या फांद्यांवरुन, कुचकुचकुणा-या सांध्यांवरुन
चारचौघातल्या खांद्यांवरुन, मिरवताना..

---------------





हा

“जस्मिनचा रवी”

उदयास येण्याआधीच अस्तास गेला

मात्र मागे ठेऊन गेलाय

असंख्य, अगणित, दैदिप्यमान करणा-या

काव्य शलाका

आपल्या सर्वांसाठी

ज्याने उजळून निघणार आहे हे

अखंड ब्रह्म

# अखेरचा सलाम ह्या “जस्मिनच्या रवीला”

नुकताच सूर्योदय झालाय
अन तो जन्माला आलाय
सूर्य-किरणांच्या झोतात चाललाय
धुलिकणांचा एक पिसाट नाच !
त्याच्या मिटल्या डोळ्यांनाही जाणवणारा

ते वैश्विक धुलिकण..
उन्मुक्तपणे तरीही एका तालात फ़िरताना
क्षणाक्षणाला वेगवेगळे आकार धारण करतायत
प्रत्येक आकार सत्य आणि सत्यच आहे
पण तोवरच
जोवर दुसरा आकार त्याची जागा घेत नाहीये !
क्षणाक्षणाला बदलणारी सत्यांची मालिका !!

पण त्यांचा आत्मा मागतो आहे..
फ़क्त एकच
आणि अंतिम सत्य

त्याने जाणले
जाणले त्याने
आणि सगळ्या सत्यांची धूळ
एक हळूवार फ़ुंकर मारून उडवून टाकली

त्याच्या बाळमुठी उघडल्या
आणि बोटे आपोआप ध्यानमुद्रेत गेली

डोळ्यात प्रशांत सागर
आणि ह्रदयात आनंदाचे झरे वहाणारा
तो जस्मिनचा रवी..
जन्मजात बुद्ध आहे



घनश्याम पोटभरे – (अहं ब्रह्मास्मि)

